वाशिम जिल्ह्यातील वाशिम व मंगरूळपीर तालुक्यातील ४ इतर जिल्हा मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.०१/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- १९ जानेवारी, २०१९

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र क्र.का२(२)/दर्जोन्नती/२०१८/४९०८ दि.०७/१२/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भाधिन पत्रान्वये वाशिम जिल्ह्यातील वाशिम व मंगरूळपीर तालुक्यातील ४ इतर जिल्हा मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत जिल्हा परिषद, वाशिम यांची मागणी आहे.

सदर रस्त्यावरील वाहतूक वर्दळ, रस्त्यावरील गावांची लोकसंख्या,रस्त्याचा होणारा वापर व लोकप्रतिनिधींची मागणी तसेच जिल्हा परिषद, वाशिम ची मागणी विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, वाशिम यांची मागणी विचारात घेऊन वाशिम जिल्ह्यातील वाशिम व मंगरूळपीर तालुक्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | समाविष्ठ रस्त्यांचा क्रमांक | साखळी क्रमांक | एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रमुख जिल्हा मार्ग -३१ ते काटा - तामसी - तांदळी - मोहोजा (राज्यमार्ग-५१) रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-५४ | ०/०० ते १७/०० | १७.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग- ४७ |
| २. | राज्यमार्ग -५१ ते फाळेगांव थेट - शिरपूटी - कृष्णा - वाई - सावळी ते बेलोरा जिल्हा सीमा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ०२ | ०/०० ते १९/७०० | १९.७०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-४८ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३. | प्रमुख जिल्हा मार्ग-३ ते वारला - वाई - जयपूर -सावळी (प्रस्तावित प्रमुख जिल्हा मार्ग) रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ५६ | ०/०० ते १२/६०० | १२.६०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-४९ |
| ४. | कळंबा महाली (राज्यमार्ग-८९) - खरोळा - वारा - कुंभी ते प्रमुख जिल्हा मार्ग-४ रस्ता. | इतर जिल्हा मार्ग- ५५ | ०/०० ते १९/०० | १९.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग- ५० |
| **एकूण** | | | | **६८.३०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील वाशिम जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत ६८.३०० कि. मी. ने वाढ होवून एकूण लांबी (९५०.४३० + ६८.३००) म्हणजेच १०१८.७३० कि.मी. इतकी व इतर जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या लांबीत ६८.३०० कि.मी. ने घट होऊन एकूण लांबी (८३२.०१० - ६८.३००) म्हणजेच ७६३.७१० कि.मी. इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०११९१६३६३०१०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2019.01.19 16:40:46 +05'30'

**( स्वरूप रायपुरे )**

उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,

महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, वाशिम.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ,वाशिम.

५) अधिक्षक अभियंता,सा.बां.मंडळ,अकोला (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, वाशिम.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.